राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर या विद्यापीठात शिक्षक समकक्ष पदाबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन शुध्दीपत्रक क्रमांकः संकिर्ण- २०१७/प्र.क्र.२८/१७/विशि-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

तारीख: ०७ मार्च, २०१७

वाचा : १) शासन निर्णय क्रमांक: एमयूएन-२००४/(१६५/०७)/विशि-५, दिनांक १५ नोव्हेंबर, २००७.

२) शासन निर्णय क्रमांक: एमयूएन-२००४/(१६५/०७)/विशि-५, दिनांक ०७ जुलै, २००८.

३) कुलसचिव, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर यांचे क्रमांक आस्था-५/१६/सेवार्थ-२/१५९६, दिनांक ०२ जानेवारी, २०१७ चे पत्र.

**शासन शुध्दीपत्रक**

राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर या विद्यापीठातील शिक्षक व शिक्षक समकक्ष पदांच्या आकृतीबंधास संदर्भाधीन क्र.१ येथील दिनांक १५ नोव्हेंबर, २००७ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहेत. सदर दिनांक १५ नोव्हेंबर, २००७ च्या शासन निर्णयामध्ये काही त्रुटी आढळून आल्यामुळे संदर्भाधीन क्र.४ येथील शासन शुध्दीपत्रक निर्गमित करण्यात आलेले आहे. तथापि, सदर दिनांक ७ जुलै, २००८ च्या शासन शुध्दीपत्रकामध्ये काही त्रुटी आढळून आलेल्या आहेत.

उपरोक्त दिनांक १५ नोव्हेंबर, २००७ च्या शासन निर्णयातील प्रपत्र-ब मधील अनु.क्र.१५ व दिनांक ०७ जुलै, २००८ च्या शासन शुध्दीपत्रकात नमूद करण्यात आलेल्या प्रपत्र-ब मधील अनु.क्र.१३ खालीलप्रमाणे वाचावा.

**प्रपत्र-ब**

**शिक्षक समकक्ष पदे**

| अनु.क्र | पदनाम | वेतनश्रेणी | मंजूर पदे | भरलेली पदे | रिक्त पदे | शासनाने मान्य केलेली पदे |
|---|---|---|---|---|---|---|
| १५ | संचालक, शारीरिक शिक्षण व क्रिडा विभाग | ८,०००-१३,५०० | १ | ० | १ | १ |

सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०७१२१९१२८६०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Vijay Eknath Sable
Date: 2017.03.07 12:20:59 +05'30'

**( विजय साबळे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन मलबार हिल, मुंबई,

२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,

३) मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,

४) मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,

५) कुलगुरू, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर.

६) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,

७) विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण,नागपूर विभाग,नागपूर.

८) कुलसचिव, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर.

९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर-२, महाराष्ट्र, (५ प्रती),

१०) महालेखापाल (लेखा परीक्षा) नागपूर-२, महाराष्ट्र, (५ प्रती),

११) जिल्हा कोषागार अधिकारी नागपूर.

१२) निवड नस्ती (विशि-१)